




महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय विस्तार इमारत, दालन क्र.५५७, ५ वा मजला
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दूरध्वनी क्रमांक-०२२-२२७९४२५७ Email ID : Desk14b.gad-mh@gov.in

**प्रशिक्षण/सर्वप्राथम्य**

क्रमांक : कअनि-११२५/प्र.क्र.३४/प्रशा-२ दिनांक:- ०२ मे, २०२५

**प्रति,**

सह/उप सचिव (आस्थापना)
मंत्रालयीन विभाग (सोबतच्या यादीप्रमाणे)
मंत्रालय, मुंबई.

**विषय:- राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत सन २०२५ मधील प्रशिक्षण**
**कक्ष अधिकारी (गट ब) यांचे पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण**
**(दिनांक ०५.०५.२०२५ ते दिनांक १६.०५.२०२५)**

संदर्भ:- १) साप्रवि, शासन निर्णय क्र.टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि.२३.०९.२०११
२) साप्रवि, शासन परिपत्रक क्र.कअप-१२१४/प्र.क्र.६५/१४-ब, दि.१३.०५.२०१५
३) महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम २०२२, दि.०२.०२.२०२२
४) संचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल जि.सांगली यांचे पत्र क्र.अ/कक्ष-३/प्रशिक्षण/कक्ष अधिकारी पदो.प्र./१५३/२०२५-२६, दि.१७.०४.२०२५
५) शासन पत्र समक्रमांक दिनांक २५.०४.२०२५

**महोदय/महोदया,**

उपरोक्त संदर्भीय क्र.१ येथील दिनांक २३.०९.२०११ अन्वये सर्व शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी प्रशिक्षण धोरण विहीत केले आहे. सदर राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत पदोन्नतीनंतर गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी ०२ आठवडे, गट क संवर्गातील कर्मचारी यांचेसाठी ०१ आठवडा व गट-ड संवर्गाकरिता तीन दिवस असा प्रशिक्षण कालावधी विहित करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र.३ येथील शासन अधिसूचना दिनांक ०२.०२.२०२२ अन्वये महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम, २०२२ प्रसिध्द करण्यात आले आहेत. सदर नियमानुसार सर्व शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना पायाभूत, उजळणी व पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण अनिवार्य करण्यात आले आहे.

२. यानुषंगाने दिनांक ०५.०५.२०२५ ते दिनांक १६.०५.२०२५ या कालावधीमध्ये कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल जि.सांगली येथे आयोजित १२ दिवसांच्या पदोन्नतीनंतरच्या प्रशिक्षणाकरीता संदर्भ क्र.५ येथील दिनांक २५.०४.२०२५ च्या पत्रान्वये कक्ष अधिकारी पदावर पदोन्नत झालेल्या ६० अधिकाऱ्यांचे नामनिर्देशन करण्यात आलेले आहे. सदर नामनिर्देशित अधिकाऱ्यांपैकी काही अधिकारी प्रशासकीय कारणामुळे/ वैयक्तिक कारणामुळे सदर प्रशिक्षणास उपस्थित राहू शकणार नसल्याने, त्यांचे नामनिर्देशन रद्द करण्यात आले

आहे. त्यामुळे आता उपरोक्त कालावधीत आयोजित प्रशिक्षणाकरिता सोबत **विवरणपत्र-अ मध्ये** जोडलेल्या कक्ष अधिकाऱ्यांचे नव्याने नामनिर्देशन करण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम २०२२ मधील नियम ५ मध्ये पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण पूर्ण न करणाऱ्या अधिकाऱ्यांची वेतनवाढ रोखण्याची तरतूद आहे. सदरहू बाब संबंधीत सर्व प्रशिक्षणार्थी कक्ष अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणून देण्यात येत आहे.

४. सदरचे प्रशिक्षण राज्य प्रशिक्षण धोरण व महाराष्ट्र नागरी सेवा (कालबध्द प्रशिक्षण) नियम २०२२ अन्वये देण्यात येत असून यासाठी उपस्थिती अनिवार्य आहे. तसेच प्रशिक्षणाबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक दिनांक १३.०५.२०१५ मधील सूचना संबंधित कक्ष अधिकारी यांच्या निदर्शनास आणाव्यात.

५. प्रशिक्षणास नामनिर्देशन केलेले कक्ष अधिकारी हे प्रशिक्षण सुरू होण्याच्या आदल्या दिवशी म्हणजेच दिनांक ०४.०५.२०२५ रोजी सायंकाळी ६.०० वाजेपर्यंत किंवा प्रशिक्षणाच्या पहिल्या दिवशी म्हणजेच दिनांक ०५.०५.२०२५ रोजी सकाळी ९.०० वाजेपर्यंत कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल जि.सांगली येथे पोहोचतील या बेताने त्यांना कार्यमुक्त करावे. **प्रवासासाठी आरक्षणाची गरज लक्षात घेऊन प्रशिक्षण कालावधीबाबत प्रशिक्षणार्थींस संबंधित विभागाने तात्काळ कळवावे.** नामनिर्देशित कक्ष अधिकाऱ्यांना संबंधित विभाग प्रमुखांनी कार्यमुक्त करणे सक्तीचे असून, कार्यमुक्तीच्या आदेशाची एक प्रत संचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल जि.सांगली तसेच या कार्यासनास पाठविण्यात यावी.

६. नामनिर्देशित कक्ष अधिकारी यांनी श्री.सी.एस.कांबळे, सहायक निदेशक (मो.नं.९८८११६२२८६) व श्री.ए.ए.मुलाणी, लेखापाल (मो.नं.९०११७६७१९६) यांच्याशी संपर्क साधावा.

७. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०५०२११५६३२०८०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**आपला**

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.05.02 11:57:39 +05'30'

**( ग.स.परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत:- वरीलप्रमाणे**

**प्रत:- माहिती व पुढील कार्यवाहीस्तव**

१) संचालक, कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल जि.सांगली
२) उप सचिव (कार्या-१२ अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) संबंधित कक्ष अधिकारी (प्रशासकीय विभागामार्फत)
४) निवडनस्ती/प्रशा-२

**राज्य प्रशिक्षण धोरणानुसार कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल जि.सांगली येथे पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण आयोजित करणेबाबत**

**विवरणपत्र-अ**

| कालावधी | स्थळ |
|---|---|
| **दिनांक ०५.०५.२०२५ ते दिनांक १६.०५.२०२५** | कुंड़ल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने), कुंडल, मु.पो. कुंडल, तालुका-पलुस जिल्हा-सांगली-४१६३०९<br>ई-मेल:- princpalkundal@gmail.com<br>श्री.सी.एस.कांबळे, सहायक निदेशक (मो.नं.९८८११६२२८६)<br>श्री.ए.ए.मुलाणी, लेखापाल (मो.नं.९०११७६७१९६) |

**प्रशिक्षणार्थी पदनाम : - कक्ष अधिकारी**

| अ. क्र. | श्री/ श्रीमती | नाव | विभाग | भ्रमणध्वनी क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री | गितेश गो.नारलावार | सामान्य प्रशासन विभाग | ७५८८५२५५६१ |
| २. | श्री | व्यंकटेश ग.आयलाने | महसूल व वन विभाग | ८८५०२५१५८४ |
| ३. | श्री | प्रताप रा.सातपुते | महसूल व वन विभाग | ७७०९३३०७७ |
| ४. | श्री | वसुदेव मा.कराड | मृद व जलसंधारण विभाग | ९८५०२३१२१९ |